**कोपबं, मुढवी ता.मंगळवेढा, जि.सोलापूर योजनेस,**
**सुधारित प्रशासकीय मान्यता प्रदान करण्याबाबत .**

**महाराष्ट्र शासन**
**जलसंपदा विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः सुप्रमा १०११/(४६१/२०११)/ ल.पा.१**
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.
तारीख: ५ फेब्रुवारी, २०१५

वाचा

**१)कार्यकारी संचालक, महाराष्ट्र कृष्णा खोरे विकास महामंडळ, पुणे यांचे जा.क्र.मकृखेविम/२११/(१११३/२०११/लपा१/८३६०, दि.१९/१०/२०११चे पत्र.**
**२)वित्त विभाग, मंत्रालय,मुंबई-३२ यांचे पत्र क्रं. व्ययस- २०१४/प्रक्रं१९९/अर्थ-२, दि.१ जानेवारी,२०१५.**

प्रस्तावना

सोलापूर जिल्ह्यातील कोपबं,मुढवी या योजनेस दिनांक ०१/०१/१९९६ अन्वये रु.२२०.०७ लक्ष इतक्या रकमेस प्रशासकीय मान्यता प्रदान करण्यांत आली होती. सदर अंदाजपत्रक १९९५-९६ च्या दरसुची नुसार तयार करण्यात आलेले होते. प्रकल्पाचे काम सुरु असतांना दरसूचीच्या दरातील वाढ, भूसंपादनाच्या किंमतीतील वाढ, संकल्पचित्रातील बदलांमुळे व इतर कारणांमुळे (निविदा अधिक्य इ.) किंमतीत झालेल्या वाढीमुळे सन १९९९-२००० ची दरसुची वापरुन सुधारित अंदाजपत्रक तयार करुन रु.३३४.५५ लक्ष रकमेस सुधारित प्रशासकीय मान्यता मिळणेबाबतचा प्रस्ताव का र्यकारी संचालक, महाराष्ट्र कृष्णा खोरे विकास महामंडळ, पुणे यांचे कडून शासनास प्राप्त झाला होता व तो शासनाच्या विचाराधिन होता. सदर प्रस्तावासंदर्भात शासनाने पुढीलप्रमाणे निर्णय घेतला आहे.

**शासन निर्णय**

१) सोलापूर जिल्ह्यातील कोपबं,मुढवी या योजनेस या योजनेस या योजनेस सन १९९९-२००० ची दरसूचीवर आधारित केलेल्या सुधारित प्राक्कलनानुसार कामाच्या अंदाजित. रु. ३३४.५५ लक्ष (रुपये तीन कोटी चवतीस लाख पंचावन हजार फक्त)या किंमतीस सुधारीत प्रशासकीय मान्यता प्रदान करण्यात येत आहे. त्यापैकी कामासाठीची एकूण तरतूद रु.३०४.१५लक्ष (रुपये तीन कोटी चार लाख पंधरा हजार फक्त) व अनुषंगिक खर्चासाठीची एकूण तरतूद रु.३०.४०लक्ष (तीस लाख चाळीस हजार फक्त) आहे. अंदाजित किंमतीचा गोषवारा सोबत जोडलेल्या विवरणपत्रात देण्यात आला आहे

२) व्यय अग्रक्रम समितीच्या दि.२१ ऑगस्ट २०१४ रोजी झालेल्या बैठकीच्या इतिवृत्तातील " काम पूर्ण झाले आहे, त्यामुळे सन २०१५-१६ मध्ये तरतूद उपलब्ध करुन दिली जाणार नाही या अटीवर प्रस्ताव मान्य् " या अटीच्या अधीन राहून सुधारित प्रशासकीय मान्यतेचा हा निर्णय निर्गमित करण्यात येत आहे.

३) या योजनेच्या कामावरील खर्च मुख्य लेखाशिर्ष मागणी आय ५ "४७०२, लहान पाटबंधाऱ्यावरील भांडवली खर्च-१९०, सार्वजनिक क्षेत्र व इतर उपक्रमा यांतील गुंतवणुका (००)(०१) महाराष्ट्र कृष्णा खोरे विकास महामंडळ भाग भांडवली अंशदान (योजनांतर्गत) (४७०२ ४७९४) या लेखाशिर्षाखाली खर्ची टाकावा व महाराष्ट्र कृष्णा खोरे विकास महामंडळाच्या मंजूर अनुदानातुन भागविण्यांत यावा.

४) हा शासन निर्णय,नियोजन विभागाच्या अनौपचारिक संदर्भ क्र.२०५/का.१४३४ दि.२४/०७/२०१३ आणि वित्त विभागाचा अनौपचारिक संदर्भ क्र. ३३८/व्यय १२ दि.०२/११/२०१३ अन्वये तसेच व्यय अग्रक्रम समीतीने दि. २१ ऑगस्ट २०१४ रोजी संपन्न झालेल्या बैठकीत दिलेल्या मंजूरीनुसार व संदर्भ क्रं २ नुसार याबाबतच्या निर्गमीत केलेल्या इतिवृत्तानुसार निर्गमीत करण्यात येत आहे.

५) या योजनेस प्रदान केलेली सुधारित प्रशासकीय मान्यता अ.क्र./२०१५ वर नोंदविण्यांत आलेली आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१५०२०७१११६४९६९२७ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Rajendra Baburao Kshirsagar

Digitally signed by Rajendra Baburao Kshirsagar
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Water Resources Department, postalCode=400032, st=Maharashtra, cn=Rajendra Baburao Kshirsagar
Date: 2015.02.07 11:33:30 +05'30'

**( रा.बा.क्षीरसागर )**
**शासनाचे अवर सचिव**

**प्रत,**

**अंदाजित किंमतीच्या गोषवाऱ्यासह :-**

१) महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र राज्य, मुंबई/नागपूर.
२) महालेखापाल (लेखा परिक्षा), महाराष्ट्र राज्य, मुंबई/नागपुर.
३) कार्यकारी संचालक, महाराष्ट्र कृष्णा खोरे विकास महामंडळ, पुणे.
४) मुख्य अभियंता, जलसंपदा विभाग, पुणे.
५) आंतर वित्त सल्लागार व सहसचिव, जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई.
६) जिल्हाधिकारी सोलापूर, सोलापूर
७) अधीक्षक अभियंता, भीमा कालवा मंडळ,सोलापूर.
८) कार्यकारी अभियंता, महाराष्ट्र कृष्णा खोरे विकास महामंडळ, पुणे.
९) उपसचिव (लपा)/ अवरसचिव (लपा)/उपअभियंता(लपा-१), जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई.
१०) कार्यासन अर्थ १-२ (२ प्रती), जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई.
११) विभागीय संपर्क अधिकारी, माहिती व जनसंपर्क, महासंचालक, मंत्रालय, मुंबई.

**(शासन निर्णय, जलसंपदा विभाग, क्र. सुप्रमा १०११/ (४६१/२०११) ल.पा.१, दि.५ फेब्रु, २०१५ चे सहपत्र)**

## विवरण पत्र

कोपबं, मुढवी ता.मंगळवेढा, जि.सोलापूर अंदाजित किंमतीचा गोषवारा

| अ.क्र. | उपशिर्ष | किंमत (रु. लक्ष) |
|---|---|---|
| १ | अ - प्राथमिक कामे | ०.०१ |
| २ | ब - भू संपादन | ०.११ |
| ३ | सी - कामे | ३०४.०३ |
| ४ | के- इमारत | ------- |
| ५ | ओ संकीर्ण | ------- |
| ६ | पी देखभाल | ------- |
| ७ | आर दळणवळण | ------- |
| ८ | अनुषंगिक खर्च | ३०.४० |
| | **एकूण** | **३३४.५५** |

## ठळक वैशिष्टे

१. योजनेची सिंचन क्षमता - ६१४ हेक्टर
२. नियोजित पाणी साठा - २९२९.७० स.घ.मी.
३. पाणी साठ्याची प्रती स.घ.मी किंमत - रु. ११४२०/-स.घ.मी.
४. लाभव्यय गुणोत्तर - १.३१